२४.
20100727185814001

**विकास योजना - शिर्डी, जिल्हा अहमदनगर**

सर्व्हे क्र. १५१ (पैकी) ४ आर क्षेत्र आ.क्र. ४५ "ट्रक टर्मिनस" (भागशः) मधुन वगळून सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्याचा प्रस्ताव..

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ३७(२) नुसार मंजुर फेरबदल

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**शासन निर्णय क्रमांक : टिपीएस-१६०६/२७७०/प्र.क्र.२१५/०९/नवि-९,**
**दिनांक : २३ जुलै, २०१०**

पहा : १)अध्यक्ष, शिर्डी नगर पंचायत यांचे पत्र क्र.नपं/बांध/कावि-०५/८२३/२००६, दि.१८/९/२००६
२)संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.वि.यो.शिर्डी/आ.क्र.४५/टिपीव्ही-४/१५६८, दि. ५/३/२००९

शासन निर्णय :- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे असाधारण राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

प्रति,
१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
४) उप सचिव (नगररचना) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
(त्यांना विनंती की, मंजूर फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाच्या तीन प्रती अधिप्रमाणित करण्यासाठी शासनास सादर कराव्यात.)
६) सहायक संचालक नगररचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर.
७) मुख्याधिकारी, शिर्डी नगर पंचायत, जिल्हा अहमदनगर.
८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, पुणे.
(त्यांना विनंती की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-एक मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या ०५ प्रती प्रत्येकी हया विभागास व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे -१ यांना पाठवाव्यात.)
९) कक्ष अधिकारी, (कार्यासन नवि-२९) यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.
१०) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

**अधिसूचना**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २३ जुलै, २०१०**

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६*

**क्र. टीपीएस-१६०६/२७७०/प्र.क्र.२१५/०९/नवि-९:** ज्याअर्थी, शिर्डी शहराची (जिल्हा अहमदनगर) विकास योजना, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांची अधिसूचना क्र. डीपी/शिर्डी/टीपीव्ही-४/७३३४, दिनांक १५ डिसेंबर, १९९२ अन्वये मंजूर केली असून ती दिनांक २५ फेब्रुवारी, १९९३ पासून अंमलात आली. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे शिर्डी येथील सर्व्हे क्र. १५१ (पैकी) मधिल ०.०४ हेक्टर क्षेत्र (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधले आहे) आरक्षण क्र. ४५ "ट्रक टर्मिनस" (भागश:) म्हणून आरक्षित आहे. (यापुढे ज्यास "उक्त आरक्षण" असे संबोधले आहे);

आणि, ज्याअर्थी उक्त विकास योजनेतील उक्त क्षेत्र उक्त आरक्षणातून वगळून अशा प्रकारे मुक्त झालेले क्षेत्र रहिवास विभागात समाविष्ट करण्याचा प्रस्ताव महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे ज्यास "उक्त अधिनियम" असे संबोधले आहे) चे कलम ३७ अंतर्गत शिर्डी नगर पंचायतीने फेरबदलाबाबतची कार्यवाही करुन दिनांक १८ सप्टेंबर, २००६ च्या पत्रान्वये प्रस्ताव शासनाच्या मंजूरीसाठी सादर केला आहे (यापुढे ज्यास "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधले आहे) ;

आणि ज्याअर्थी, उक्त फेरबदल प्रस्तावाच्या अनुषंगाने, आवश्यक त्या चौकशी नंतर व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्ताव काही बदलांसह व अटीसह मंजूर करणे आवश्यक आहे असे राज्य शासनाचे मत झाले आहे;

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम ३७ पोटकलम (२) अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकाराचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास शासन पुढीलप्रमाणे काही बदलांसह सशर्त मंजूरी देत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दिनांक १५ डिसेंबर, १९९२ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे;

उक्त विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल सूचीच्या शेवटच्या नोंदीनंतर खालील फेरबदल नोंदीचा नव्याने समावेश करण्यात येत आहे.

**"नोंद"**

"मौजे शिर्डी येथील सर्व्हे क्र. १५१ (पैकी) मधिल ४ आर क्षेत्र नकाशात दर्शविल्याप्रमाणे आरक्षण क्र. ४५ "ट्रक टर्मिनस" (भागश:) मधुन वगळून मुक्त झालेले क्षेत्र खालील अटीच्या अधिन राहून सार्वजनिक निमसार्वजनिक विभागात समाविष्ट करण्यात येत आहे.

अट- विषयांकित जागेचा विकास करताना संबंधीत नियोजन प्राधिकरण / विभाग यांची परवानगी / ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक राहील.

टिप:- (क) उक्त फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत मुख्याधिकारी, शिर्डी नगर पंचायत, जिल्हा अहमदनगर यांच्या कार्यालयांत, कार्यालयीन वेळेमध्ये नागरीकांच्या अवलोकनार्थ एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

(ख) सदर फेरबदलाची अधिसूचना विभागाच्या www.urban.Maharashtra.gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**NOTIFICATION**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 23rd July, 2010**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.***

**No. TPS-1606/2770/CR-215/09/UD-9:-** Whereas, the Development Plan of Shirdi has been sanctioned by the Director of Town Planning, Maharashtra State, Pune vide his Notification, No. DP/Shirdi/TPV-4/7334, dated 15th December, 1992 and has came into force on 25th February, 1993 (hereinafter referred to as "the said Development plan") ;

And whereas, in the said Development Plan the land bearing Survey No. 151 (pt.) of Mouje Shirdi admeasuring 0.04 Ha. (hereinafter referred to as "the said Land") is reserved as Site No. 45 "Truck Terminus" (pt.) (hereinafter referred to as "the said Reservation") ;

And whereas, the Shirdi Nagar Panchayat vide its letter dt. 18th September, 2006 submitted the proposal of deleting the said Land from the said Reservation and to include the land so released in residential zone (hereinafter referred to as "the said Modification Proposal) after following all the procedure laid under section 37 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII) (hereinafter referred to as "the said Act") to Government for sanction ;

And whereas, after making necessary enquiries and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is satisfied that the said Modification Proposal should be sanctioned with some changes and conditions ;

Now therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of section 37 of the said Act & all other powers in that behalf Government hereby sanctions the said Modification Proposal with some conditions and for that purpose amends the above referred Notification dated 15th December, 1992 as follows -

In the schedule of modification after last entry, following new entry shall be added ;

**ENTRY**

"The land bearing Survey No. 151 (pt.) of Mouje Shirdi admeasuring 0.04 Ha. is deleted from Site No. 45 "Truck Terminus" (pt.) and land so released is included in Public Semi - Public Zone as shown on plan subject to following condition-".

**Condition :** It is necessary to obtain permission / N.O.C. of concerned planning authority / department while developing the land under modification.

**Note:-** A) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available in the office of the Chief Officer, Shirdi Nagar Panchayat, Dist. Ahemadnagar during office hours on all working days for inspection of public for a period of one months.

B) This notification is also published on Government web site at www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)
**Section Officer**

Adhisuchna Shirdi 37(2) 154